**पेंच प्रकल्प, ता. पारशिवनी, जि. नागपूर या प्रकल्पाच्या रु. १६८५.८८ कोटी इतक्या किंमतीस तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०२२/३६२ /प्र.क्र.१०३ /मोप्र-२**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ मार्च, २०२३.

<u>पहावे</u> :- १. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/(३५/२०१५)/जसं(आ) दिनांक ९ सप्टेंबर, २०१५.
२. शासन शुद्धिपत्रक क्र. संकीर्ण-२०१५/(३५/२०१५)/जसं(आस्था) दि. २२ जून, २०१६.
३. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र जा.क्र.२५०१/विपाविम/ कांता-६(१)/ (धा.क्र. ४९९/२०२०)/२०२२, दि. २५.३.२०२२.

<u>प्रस्तावना :-</u>

पेंच प्रकल्पांतर्गत पेंच नवेगांव खैरी धरण हे पारशिवणी तालुक्यातील जि.नागपूर येथील सर्वसाधारण प्रदेशातील आहे. खिंडसी पूरक कालवा योजना हा रामटेक तालुक्यातील जि.नागपूर येथील सर्वसाधारण प्रदेशातील आहे. तसेच पेंच प्रकल्पांतर्गत नवेगाव खैरी (पेंच) उच्च पातळी कालवा योजना हि पारशिवणी तालुक्यातील जि.नागपूर येथील सर्वसाधारण प्रदेशातील आहे. पेंच प्रकल्पाच्या पाण्याचा वापर उजव्या व डाव्या कालव्याद्वारे नागपूर व भंडारा जिल्ह्यातील एकुण १,०४,४७६ हे. सिंचन क्षेत्रासाठी तसेच पेंच उच्च पातळी कालव्याअंतर्गत ४३८ हे. सिंचन क्षेत्रासाठी असे एकूण १,०४,९१४ हे. सिंचन क्षेत्रासाठी प्रस्तावित आहे.

पेंच प्रकल्प, ता. पारशिवनी, जि. नागपूर या प्रकल्पाच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावास राज्य तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांच्या दि.२३.१२.२०२० रोजी झालेल्या १५३ व्या बैठकीत शिफारशीसह निर्णय झाला आहे. तसेच राज्य तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांचे छाननी अहवालातील मुद्दा क्र. २६ व २७ चा अनुपालन अहवाल त्रिसदस्यीय उपसमितीपुढे ठेवण्याकरिता सादर केला असता, अ.मु.स. (वित्त) यांच्या अध्यक्षतेखालील सचिव स्तरावरील उप समितीच्या दि.१५.०७.२०२१ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्ताव पुढील निर्णयार्थ मा.मंत्रीमंडळासमोर निर्णयार्थ सादर करण्यासाठी नियामक मंडळास शिफारस करण्यात आली आहे.

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाच्या दि.११.११.२०२१ रोजी झालेल्या नियामक मंडळाच्या बैठकीत सदर प्रस्ताव मा.मंत्रीमंडळासमोर सादर करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१५/३५/२०१५/जसं (आ) दि. ०९.०९.२०१५ व समक्रमांकाचे शुध्दीपत्रक दि. २२.०६.२०१६ मधील परिच्छेद क्र. ४ अन्वये राज्य तांत्रिक सल्लागार समितीचा अहवाल व त्यावरील उपसमितीने नोंदविलेल्या निरीक्षणास अनुसरुन नियामक मंडळाने निर्णय घेतलेले प्रकरणे मा.मंत्रीमंडळासमोर विचारार्थ सादर करण्याची तरतुद आहे.त्याअनुषंगाने पेंच प्रकल्प, ता. पारशिवनी, जि. नागपूर या प्रकल्पाच्या रु. १६८५.८८ कोटी इतक्या किंमतीस तृतीय

सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव मा.मंत्री मंडळाच्या दि. २९.१२.२०२२ रोजीच्या बैठकीत विचारार्थ ठेवण्यात आला होता. मा.मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, सदर योजनेचे फेर नियोजन, किंमत वाढीची कारण मिमांसा इत्यादी बाबींचा परामर्श घेवुन पेंच प्रकल्पाच्या (जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१८-१९ च्या दरसूची वर आधारीत) रु.१६८५.८८ कोटी किंमतीच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावास मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

पेंच प्रकल्पाच्या (जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१८-१९ च्या दरसूची वर आधारीत) रु.१६८५.८८ कोटी किंमतीच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय गोषवारा परिशिष्ट “अ” प्रमाणे आहे.

१. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील परिच्छेद क्र.२६ व २७ अंतर्गत नमूद सर्व मुद्दयांचे अनुपालन करावे.

२. सदर प्रकल्पाच्या तृतीय सु.प्र.मा. प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

३. प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी

४. उपलब्ध निधीचे Thin Spreading टाळणेचे दृष्टीने प्रकल्प घटकांच्या बांधकामावरील गुंतवणुकीचा प्राधान्य क्रम निश्चित करून त्यानुसारच कामे करावीत.

५. उच्च न्यायालयातील प्रलंबित जनहित याचिका तसेच विशेष चौकशी समितीच्या अनुषंगाने लू किंवा प्रस्तावित चौकश्या व त्यानुंषगाने करावयाच्या कार्यवाहीवर या सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या निर्णयामुळे कोणतीही बाधा पोहचणार नाही.

६. प्रकल्प कार्यान्वित करण्यातील काही अनियमितता निदर्शनास आल्यास त्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांवर राहील.

७. पूर्ण झालेल्या घटक कामांचे घटक निहाय समाप्ती अहवाल तयार करुन सदर कामे तात्काळ व्यवस्थापनास हस्तांतरीत करावीत.

८. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यन्वीत करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत धरता येणार नाही.

९. प्रकल्पावर ज्या ठिकाणी वितरीका/लघू कालवे यांची कामे हाती घेतलेली नाहीत अशा ठिकाणी बंद नलिकेव्दारे सिंचन करण्याचा पर्याय वापरण्यात यावा.

१०. प्रकल्पासाठी आवश्यक वैधनिक मान्यता प्राप्त करून घेण्यात याव्यात.

११. शासनाने दि.०९.०३.२०१७ च्या पत्रान्वये आदेशित केल्यानुसार Technical Audit करण्यात यावे. Technical Audit चा अहवाल प्राप्त झाल्यानंतर आवश्यकतेनुसार जवाबदारी निश्चित करण्यात यावी.

१२. सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तांत्रीक व निविदा विषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

१३. सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

१४. सौरउर्जा वापराच्या अनुषंगाने काही यंत्रणा उभारणी करणे आवश्यक असल्यास त्याकरीत येणाऱ्या खर्चाची तरतूद प्रकल्पाच्या पुढील सुधारित प्रकल्प अहवात करून त्यास प्रचलित कार्यपद्धती नुसार विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाच्या नियामक मंडळाकडून सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त करुन घ्यावी. याकरीता मंत्रीमंडळासमोर प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता नाही.

२. या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-०५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च (८०), सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०४) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजनेअंतर्गत) पेंच प्रकल्पाचे काम या खाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय दिनांक २९.१२.२०२२ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाचे निर्णयाचे अनुषंगाने सहमती दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेल्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेची नोंद मोठे प्रकल्प-२ कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीमध्ये सन २०२२-२३ अ.क्र. ०२ वर घेण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०३०९१८१८५५०७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b6bdca03112e343fc09cdae1147a23ad091dd823afbb7c549912fb806d1d1988, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E4FEAD3E1483D349ED241656A1F084DD45F2A44B5F36F642E970C90EF9F2D31F, cn=AMOL BAPURAO FUNDE
Date: 2023.03.09 18:24:39 +05'30'

**( अमोल फुंदे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**सहपत्र : परिशिष्ट :- अ**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

५) मा.विरोधी पक्षनेते,विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
८) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
९) महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक
१०) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग, नागपूर
११) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर
१३) जिल्हाधिकारी, नागपूर
१४) उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१५) अर्थ शाखा १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१६) निवड नस्ती- मोप्र-२.

## परिशिष्ट-अ

शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०२२/३६२ /प्र.क्र.१०३ /मोप्र-२, दिनांक ०९ मार्च, २०२३ चे सहपत्र पेंच प्रकल्पाच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकातील **उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा**

**(१) पेंच पाटबंधारे प्रकल्प**:

| उपशिर्ष | मंजूर द्वितीय सुप्रमा नुसार (सन २००८-०९) | प्रस्तावित तृतीय सुप्रमा नुसार (सन २०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| अ- प्राथमिक | ०.३५ | ०.३५ | ० |
| ब - जमिन | ५.२१ | ५.२५ | ०.०४ |
| सी - कामे | १९४.३१ | ४२६.३० | २३१.९९ |
| डी - वितरीका | ६.१ | १५.७७ | ९.६७ |
| ई - प्रपात | १.१५ | १०.६८ | ९.५३ |
| एफ-आर.एच.टी.कामे | १०.०७ | १६.२७ | ६.२ |
| जी - पुल | ८.९९ | १९.६६ | १०.६७ |
| एच- एस्केप | ०.९७ | १.४२ | ०.४५ |
| के - इमारती | १८.५४ | ४१.८८ | २३.३४ |
| एल - मातीकामे | १५ | १५.७९ | ०.७९ |
| एम - वृक्षारोपन | ०.६३ | ०.६३ | ० |
| ओ - संकीर्ण | २.८ | १२.९९ | १०.१९ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ४.६७ | ८.१६ | ३.४९ |
| क्यू - हत्यारे व संयंत्रे | २.५१ | २.५१ | ० |
| आर - दळणवळण | ०.९४ | ०.९४ | ० |
| यु- वितरीका भाग-३ | २४३.०४ | ४४२.२८ | ११९.२४ |
| व्ही - शेतचाऱ्या | ० | ० | ० |
| डब्लु - निचराकामे | ० | ० | ० |
| एक्स - पर्यावरण | २.५९ | ३.८८ | १.२९ |
| एकूण: | ५१७.८७ | १०२४.७६ | ५०६.८९ |
| L.D. भाग -१ कामे | ४४.६४ | ४४.६४ | ० |
| पेंच सौंदर्यीकरण | ०.४६ | १.१२ | ०.६६ |
| तोतलाडोह संबंधीत | ६०.६५ | ६०.६५ | ० |
| एकुण: | ६२३.६२ | ११३१.१७ | ५०७.५५ |
| अनुषंगीक खर्च | ८२.८१ | १०८.३५ | २५.५४ |
| **एकूण:** | **७०६.४३** | **१२३९.५२** | **५३३.०९** |

**(२) खिंडसी पूरक कालवा:**

( रू. कोटी )

| उपशिर्ष | मंजूर द्वितीय सुप्रमा नुसार (सन २००८-०९) | प्रस्तावित तृतीय सुप्रमा नुसार (सन २०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| अ- प्राथमिक | ०.९४ | ०.६२ | -०.३२ |
| ब - जमिन | ५.२८ | १४.०५ | ८.७७ |
| सी - कामे | ९.४२ | १४.६१ | ५.१९ |
| डी - वितरीका | २.२३ | १४.६८ | १२.४५ |
| ई - प्रपात | ०.३१ | ० | -०.३१ |
| एफ- RHT कामे | १०४.१३ | २६९.९५ | १६५.८२ |
| जी - पुल | ३.४८ | १५.५१ | १२.०३ |
| एच- एस्केप | २.४३ | २.१६ | -०.२७ |
| के- इमारती | ०.९२ | ०.१ | -०.८२ |
| एल - मातीकामे | ४१.८ | ६३.२४ | २१.४४ |
| एम - वृक्षारोपन | ०.१५ | ०.३७ | ०.२२ |
| ओ - संकीर्ण | ४.६२ | ७.३१ | २.६९ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | १.५४ | २.७४ | १.२ |
| क्यू - हत्यारे व संयंत्रे | ० | ० | ० |
| आर - दळणवळण | ०.५ | ० | -०.५ |
| यु-वितरीका भाग-३ | २.३९ | ० | -२.३९ |
| व्ही - शेतचाऱ्या | ८.०९ | ० | -८.०९ |
| डब्लु - निचराकामे | ०.२५ | ० | -०.२५ |
| एक्स - पर्यावरण | ०.२५ | ० | -०.२५ |
| एकूण: | १८८.७३ | ४०५.३४ | २१६.६१ |
| अनुषंगीक खर्च | २५.०६ | २०.३९ | -४.६६७ |
| **एकूण:** | **२१३.७९** | **४२५.७३** | **२११.९४** |

**(३) पेंच उच्च पातळी कालवा:.**

**(₹ कोटी)**

| उपशिर्ष | मंजूर द्वितीय सुप्रमा नुसार (सन २००८-०९) | प्रस्तावित तृतीय सुप्रमा नुसार (सन २०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| अ- प्राथमिक | ०.११ | ०.१३ | ०.०२ |
| ब- जमिन | २.७९ | ३.८९ | १.१ |
| सी - कामे | ० | ० | ० |
| डी- वितरीका | ७.७७ | ११.३७ | ३.५९ |
| ई- प्रपात | ० | ० | ० |
| एफ- आर.एच.टी.कामे | ० | ० | ० |
| जी - पुल | ० | ० | ० |
| एच- एस्केप | ० | ० | ० |
| के- इमारती | ० | ० | ० |
| एल- मातीकामे | ० | ० | ० |
| एम- वृक्षारोपन | ०.०१ | ०.०२ | ०.०१ |
| ओ - संकीर्ण | ०.०२ | ०.२ | ०.१८ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.०८ | ०.०८ | ० |
| क्यू- हत्यारे व संयंत्रे | ० | ० | ० |
| आर- दळणवळण | ०.१ | ० | -०.१ |
| यु- वितरीका भाग-०३ | ४.६३ | २.७४ | -१.८९ |
| व्ही- शेतचाऱ्या | १.२६ | १.३३ | ०.०७ |
| एकूण: | १६.७७ | १९.७६ | २.९८ |
| अनुषंगीक खर्च | २.२३ | ०.८७ | -१.३६ |
| **एकूण:** | **१९.००** | **२०.६३** | **१.६३** |
| **एकूण एकंदर (१+२+३)** | **९३९.२२** | **१६८५.८८** | **७४६.६६** |